बाराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत.
श्रीमंतराव मगरे कापूस उत्पादक मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या., सागरवाडी, ता. बदनापूर, जि. जालना.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाभाभा-१११६/प्र.क्र.२६/टेक्स-१ (ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१.०३.२०२३

वाचा :-

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र. सूतगि-२१९३/प्र.क्र.१८३/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ .
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि- ११९७/प्र. क्र.१९३/टेक्स-१, दिनांक २४.०३.१९९९.
३. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्र.एमपीसी १०९९/प्र.क्र.२४४/विघयो -२, दिनांक३०.०३.२०००.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्र.सूतगि-११०५/प्र. क्र.३८/टेक्स-१(अ), दिनांक १५.०६.२००६.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. प्रकल्प १२१६/प्र.क्र.२/टेक्स १-(अ) दिनांक १७.०२.२०१६.
६. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.नोंदणी-१८१५/प्र. क्र.२४/टेक्स-१(ब), दिनांक १८.११.२०१५
७. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सूतगि २०१५/प्र क्र ३६३/अजाक, दिनांक १५.०२.२०१६
८. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.शाभाभा-१११६/प्र. क्र.२६/टेक्स-१(ब), दिनांक ०१.१२.२०१६.
९. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-३३१६/प्र. क्र.८१/टेक्स-१(अ), दिनांक १०.०७.२०१७.
१०. वस्त्रोद्योग आयुक्तालय नागपूर यांचे पत्र जावक क्र. कार्या-६(१)/सूतगि/शाभाभा प्रस्ताव/१४५१/ २०२१, दिनांक ०५.०३.२०२१
११. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.शाभाभा-१११६/प्र. क्र.२६/टेक्स-१(ब), दिनांक ०३.०२.२०२२.
१२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.शाभाभा-१११६/प्र. क्र.२६/टेक्स-१(ब), दिनांक ३१.०३.२०२२.
१३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं २०२२/प्र क्र ४३/ अर्थ -३, दिनांक ०४.०४.२०२२
१४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं २०२२/प्र क्र ४३/ अर्थ -३, दिनांक १६.०३.२०२३

१५. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. बीजीटी २०२२/ प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २९.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

बाराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या व शासकीय अर्थसहाय्यासाठी निवडलेल्या सहकारी सूतगिरण्यांनी शासनाकडे सादर केलेल्या प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्यासाठी कर्जे व भागभांडवलाचे प्रमाण १:१ ठेवून सभासद भागभांडवलाच्या १:९ प्रमाणात शासकीय भागभांडवल देण्यासाठी शासनाने मान्यता दिलेली आहे. या सूतगिरणीने शासनास सादर केलेल्या प्रकल्प अहवालाच्या अनुषंगाने प्रकल्प उभारणीच्या कामात केलेली प्रगती लक्षात घेऊन तसेच आतापर्यंत सभासदांकडून जमा केलेले भाग भांडवल लक्षात घेऊन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दि.२९.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये या सूतगिरणीस वितरीत करावयाच्या रु.१७६.८० लक्ष शासकीय भागभांडवलाची रक्कम सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना BDS प्रणालीवर वितरीत केली आहे. त्यानुसार श्रीमंतराव मगरे कापूस उत्पादक मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या., सागरवाडी, ता. बदनापूर, जि. जालना या सूतगिरणींस सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात शासकीय भागभांडवल उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्रीमंतराव मगरे कापूस उत्पादक मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या., सागरवाडी, ता. बदनापूर, जि. जालना या सूतगिरणीची दि.१८.११.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये बाराव्या पंचवार्षिक योजनेत समावेश करुन अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली असून सूतगिरणीच्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीस दि.१७.०२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेली आहे. प्रकल्प अहवालानुसार रु.३०८.७१ लाख इतके सभासद भागभांडवल जमा करणे आवश्यक असून त्यांनी रु.१७४.०० लाख सभासद भागभांडवल जमा केले आहे. शासन निर्णय दि.१५.०६.२००६ नुसार मागासवर्गीय सूतगिरण्यांच्या बाबतीत ५०% सभासद भाग भांडवलाची अट शिथिल करण्यात आली आहे. १:९ प्रमाणानुसार या सूतगिरणीला रु.१५६६.०० लाख इतके शासकीय भागभांडवल अनुज्ञेय आहे. त्यापैकी सूतगिरणीस दि.१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.६६५.०० लाख, दि.०३.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.२५०.०० लाख, दि. ३१.३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.४७.४२ लाख व दि.०२.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.४२६.७८ लाख असे एकूण रु.१३८९.२० लाख इतके शासकीय भागभांडवल वितरीत करण्यात आले असून रुपये १७६.८० लाख इतके शासकीय भागभांडवल देय आहे.

२. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. एन -४, ४४२५ - सहकारावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१)(०१) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम), (४४२५ २२२३), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सुधारीत अंदाजानुसार रु.६९०४.८५ लाख इतकी तरतूद करण्यात आली असून वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३ व दिनांक १६.०३.२०२३ नुसार राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली

महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. प्रकल्प अहवालानुसार मान्य किंमतीनुसार त्या त्या बाबींकरिता विहित मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च सूतगिरणी स्वनिधीतून करील या अटीच्या अधीन राहून तसेच शासन निर्णय दि.३०.०३.२००० च्या सर्व अटी व तरतूदी यांचे तंतोतंत पालन या सूतगिरणीने केले आहे याची शहानिशा आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करण्याच्या अटीवर या सूतगिरणीस **रु.१,७६,८०,०००/- (रुपये एक कोटी शहात्तर लाख ऐंशी हजार फक्त)** इतकी रक्कम शासकीय भागभांडवल म्हणून मंजूर करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**"सूतगिरणीकडे सध्या शिल्लक असलेल्या रक्कमेपैकी ७५% रक्कम खर्च झाल्यानंतर, तसेच उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) सादर केल्यानंतर आता मंजूर रक्कम उचल करण्यास आयुक्त, वस्त्रोद्योग यांनी मान्यता दयावी."**

३. सदर शासकीय भागभांडवल शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/प्र.क्र.१८३/टेक्स-१, दि.११.०८.१९९३ व सूतगि-११९७/ प्र.क्र.१९३/ टेक्स-१, दि.२४.०३.१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच शासकीय भाग भांडवलासंदर्भात शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

१) प्रस्तुत सूतगिरणींकडून, शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८३/टेक्स-१, दि.११.०८.१९९३ व दि.२४.०३.१९९९ मधील अटी व शर्तींचे पालन होत आहे याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी खात्री करावी.

२) शासकीय भागभांडवलाच्या वसुलीबाबत संदर्भ क्र.२ येथील दि.२४.०३.१९९९ रोजीच्या शासन निर्णयातील अ.क्र.५ मध्ये, संदर्भ क्र.६ येथील दि.१०.७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून त्यानुसार सूतगिरणीने भागभांडवलाचा पहिला हप्ता स्विकारल्यानंतर ५ वर्षांनी किंवा सूतगिरणी सुरु झाल्यानंतर ३ वर्षांनी यापैकी जे आधी घडेल तेव्हापासून उचल केलेल्या भागभांडवलाची परतफेड १/१५ प्रमाणे सुरु करण्यात येईल आणि असे न केल्यास त्यावर दरसाल दर शेकडा १२% प्रमाणे व्याज आकारण्यात येईल.

३) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी सदर सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

४) प्रस्तुत सूतगिरणीसंदर्भात शासन निर्णयामधील तरतुदीनुसार वसुलीबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी.

५) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी पुढील ३ महिन्यांत सदर सूतगिरणीच्या विद्यमान संचालक मंडळाकडून प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत उपरोक्त तक्त्यातील सूतगिरणीच्या नावासमोरील रकमेच्या ५% इतक्या वैयक्तिक मत्तेचे तारण मिळवावे. जोपर्यंत असे वैयक्तिक तारण प्राप्त होणार नाही तोपर्यंत प्रस्तुत वितरीत रक्कम सूतगिरणीस खर्च करता येणार नाही तसेच तोपर्यंत या आदेशाद्वारे मंजूर केलेल्या रकमेवर सूतगिरणीस अधिकर्ष (overdraft) काढून रक्कम

खर्च करता येणार नाही असे बंधन आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी संबंधित बँकेवर घालावे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी काटेकोरपणे व तातडीने कार्यवाही करावी.

६) या आदेशानंतर प्रस्तुत सूतगिरणीच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास, नवनियुक्त संचालक मंडळाने शासकीय भागभांडवलाच्या ५% इतके वैयक्तिक मालमत्तेचे तारण भरल्याशिवाय नवीन संचालक मंडळ अस्तित्वात येणार नाही. पुर्वीच्या संचालक मंडळाने काही गैरव्यवहार केला नसेल किंवा त्यांच्या विरुध्द गुन्हा दाखल झाला नसेल तरच नवनियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतरच पूर्वीच्या संचालक मंडळाचे वैयक्तिक तारण मुक्त करण्यात येईल, अशी सुधारणा संस्थेच्या By - Laws मध्ये करण्याची कार्यवाही आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

७) सूतगिरणींच्या प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाच्या Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही. त्यामुळे त्याबाबतची खात्री आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करुन घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

८) प्रस्तुत सूतगिरणीकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करीत असल्याची खात्री आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

९) प्रस्तुत सूतगिरणीने कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण ठेवावे.

१०) प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबीवर होणारा जास्तीचा खर्च सूतगिरणी स्वनिधीतून करील या अटीवर शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी तशी कार्यवाही करावी.

११) सदर सूतगिरणीच्या खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे अदा करावी. निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये याबबात आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी खात्री करावी.

१२) सूतगिरणीस प्राप्त झालेल्या भागभांडवलाचा तसेच शिल्लक रकमेचा सूतगिरणी योग्य प्रकारे विनियोग करते किंवा नाही याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण ठेवावे.

१३) सूतगिरणीने भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण करावे.

१४) प्रस्तुत सूतगिरणीने खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा करावे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण करावे.

१५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६ व शासन निर्णय क्र. भांखस २०१७/ प्र.क्र.२०४/उद्योग-४, दि.०८.१२.२०१७ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

१६) सूतगिरणीची उभारणी विहित कालमर्यादेत पूर्ण करावी.

१७) सहकारी सूतगिण्यांवर शासकीय अधिकारी नेमण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन असून याबाबतचा अंतिम निर्णय सर्व सूतगिरण्यांना बंधनकारक राहील.

१८) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभागाच्या दि.३०.०३.२००० रोजीच्या शासन निर्णयानुसार मागासवर्गीय सूतगिरण्यांना विशेष घटक योजनेतून दिर्घ मुदती कर्ज देण्याचा

निर्णय शासनाने घेतला आहे. सदर शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार सदर सूतगिरणी ही मागासवर्गीय प्रवर्गातील असल्यास त्या सूतगिरणीचा अध्यक्ष व उपाध्यक्ष हा अनुसूचित जातीचा असावा, तसेच या सूतगिरणीमध्ये ७०% पेक्षा जास्त सभासद अनुसूचित जातीचे असावेत. तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.१५.०२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार सूतगिरण्यांच्या मागासवर्गीय सभासदांचे जात वैधता प्रमाणपत्र असणे बंधनकारक आहे. सदर अटीची पूर्तता केल्याशिवाय सूतगिरणीस या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम खर्च करता येणार नाही व अधिकर्ष काढता येणार नाही. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी तसे बंधन बँकेवर तसेच सूतगिरणीवर घालावे.

१९) शासन निर्णय दि.३०.०३.२००० च्या सर्व अटी व तरतूदी यांचे तंतोतंत पालन या सूतगिरणीने केले आहे याची शहानिशा आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

२०) सदर सूतगिरणीच्या सर्व सभासदाने त्यांचे आधार कार्ड नंबर लिंक करणे बंधनकारक राहिल.

२१) सूतगिरणी उभारण्यासाठी ५:४५:५० या आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार सूतगिरणीने ५% सभासद भागभांडवल उभारणे बंधनकारक असून सदर सभासद भागभांगभाडवलाची रक्कम सूतगिरणीच्या प्रयोजनाव्यतिरक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी खर्च करता येणार नाही. तसेच शासनाकडून सूतगिरणीला मंजूर करण्यात येणाऱ्या ४५% शासकीय भागभांडवलाच्या रक्कमेचा विनियोग करताना सूतगिरणीने ५०% सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग अथवा वित्तीय संस्थेकडून कर्ज म्हणून मंजूर करुन घेतलेली असणे आवश्यक आहे. शासकीय भागभांडवलापोटी प्राप्त रक्कमेचा विनियोग करताना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून / वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाचाही विनियोग त्याच प्रमाणात करणे गिरणीवर बंधनकारक राहील.

२२) प्रकल्प अहवालानुसार मान्य किंमतीनुसार त्या त्या बाबींकरिता विहित मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च सूतगिरणी स्वनिधीतून करील याची दक्षता आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी घ्यावी.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवलाची रक्कम **रु.१,७६,८०,०००/- (रुपये एक कोटी शहात्तर लाख ऐंशी हजार फक्त)** इतकी रक्कम श्रीमंतराव मगरे कापूस उत्पादक मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या.,सागरवाडी, ता. बदनापूर, जि. जालना या सूतगिरणीच्या युनियन बँक ऑफ इंडिया, मुख्य शाखा, पैठण गेट, औरंगाबाद खाते क्रमांक ३४४५०१०१००५१०३१ मध्ये RTGS द्वारे जमा करावी. सूतगिरणीने प्रकल्प पूर्ण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात, शासन निर्णय दि.१५.०६.२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०४.०४.२०२२ सोबतच्या परिशिष्ठातील अ. क्र. ९ येथील “३२-अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून या बाबीखालील अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे. या परिपत्रकातील भाग १ मधील अनिवार्य खर्चाशी संबंधित अ. क्र. ५,६,७,८ व ९ तसेच प्राधान्य विभागाशी संबंधित अ.क्र. १० मधील तरतूदी या प्रकरणी लागू होत नाहीत.

**६.** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१०.०५.२०१६ मधील परिच्छेद- ब (२) येथे नमूद केल्यानुसार प्रस्तुत प्रकरणास वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे. तसेच या परिपत्रकातील परिच्छेद-ब (३) नुसार, वित्त विभाग परिपत्रक, दि.०४.०४.२०२२ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सुचीमधील असलेल्या मुद्द्यांची पूर्तता या प्रकरणी होत आहे.

**७.** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१०.०५.२०१६ मधील परिच्छेद- अ नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि.०४.०४.२०२२ अन्वये “३२ अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

२) “मागणी क्र. एन -४, ४४२५ - सहकारावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१)(०१) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम), (४४२५ २२२३), ३२ अंशदाने” या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सुधारीत अंदाजानुसार प्राप्त तरतूद रु.६९००.०० लाख करण्यात आली आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:- या योजनेखाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे:- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे:- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा:- सूतगिरणीच्या स्थापत्य बांधकामाच्या निविदांना मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीची मान्यता घेऊनच सूतगिरणीने बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी करणे बंधनकारक आहे.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत:- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

९) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी:- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

८. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या **रु.१,७६,८०,०००/- (रुपये एक कोटी शहात्तर लाख ऐंशी हजार फक्त)** इतक्या शासकीय भागभांडवलाचा खर्च “मागणी क्र. एन -४, ४४२५ - सहकारावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१)(०१) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम), (४४२५ २२२३), ३२ अंशदाने” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

९. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली **रु.१,७६,८०,०००/- (रुपये एक कोटी शहात्तर लाख ऐंशी हजार फक्त)** इतकी रक्कम श्रीमंतराव मगरे कापूस उत्पादक मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या., सागरवाडी, ता. बदनापूर, जि. जालना या सूतगिरणीच्या नावाने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन सूतगिरणीच्या युनियन बँक ऑफ इंडिया, मुख्य शाखा, पैठण गेट, औरंगाबाद खाते क्रमांक ३४४५०१०१००५१०३१ मध्ये RTGS, IFSC क्र.UBIN०५३४४५५मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. सु.ल.काठोळे, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. स. दि. खरात, उप सचिव (सूतगिरणी), (V०००९), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना “नियंत्रण अधिकारी”म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**१०.** सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३ व दिनांक १६.०३.२०२३ नुसार विभागास प्राप्त अधिकारानुसार तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय दि.२९.०३.२०२३ नुसार दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३१२२३७३७६३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASENJEET D KARLEKAR

Digitally signed by PRASENJEET D KARLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=58B95820309E7F466AE2AD722C14D2E8910FE2F9D499461E1829267B19AB9CFC, cn=PRASENJEET D KARLEKAR
Date: 2023.03.31 23:01:05 +05'30'

**( प्रसेनजीत कारलेकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
४. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (४ प्रती).

५. अवर सचिव, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
६. कार्यासन अधिकारी (व्यय-२ / अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन अधिकारी (कार्यासन-१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. आयुक्त, वस्त्रोद्योग,महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. प्रादेशिक उपायुक्त, वस्त्रोद्योग, औरंगाबाद
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती).
१४. महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१.
१५. अध्यक्ष, श्रीमंतराव मगरे कापूस उत्पादक मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या., सागरवाडी, ता. बदनापूर, जि. जालना
१६. निवड नस्ती (टेक्स १ ब).